**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थानमहाभियान**

पंढरपूर नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास (टप्पा-१) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बैठक-२०१५/प्र.क्र.३८(२)/नवि-३३

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

तारीख: **२६ मार्च, २०१५**

**वाचा -**

1. **शासन निर्णय क्र: नगरो २०१४/प्र. क्र. ११९/नवि ३३, दिनांक २१ऑगस्ट,२०१४.**
2. **दिनांक २२/०८/२०१४ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानाखालील प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त**
3. **नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे क्र. नपप्रसं/नगरोत्थान/पंढरपूर रस्ते विकास/ सं.६७८५/ क.१३ दि. ०५ सप्टेंबर २०१४ रोजीचे पत्र.**

**प्रस्तावना -**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता शासन निर्णय क्र. एनयुआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३ दि. २०/०२/२०१० च्या तरतुदीच्या अधीन राहून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थानमहाभियान योजना राबविण्यात येत होती.तथापि संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, सदरहू दि.२०/०२/२०१० चा शासन निर्णय अधिक्रमित करून, महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थानमहाभियानाच्या वित्तीय आकृतीबंधात व व्याप्तीमध्ये सुधारणा करण्यात आली आहे.त्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतुदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान यापुढे राबविले जाईल.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंतीनगरोत्थान अभियानांतर्गतपंढरपूर नगरपरिषदेचा रस्ते विकास प्रकल्पाचा एकूण रुपये१८०.१४ कोटीचा प्रकल्प प्रस्तावनगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता.या प्रस्तावास मुख्यअभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे-१ यांनी दिनांक२१/०८/२०१४ रोजीच्यापत्रान्वये तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने राज्यस्तरीय मान्यता समितीने दि. ३०/०८/२०१४ रोजी झालेल्या बैठक क्र. २ मध्ये शासन मान्यतेच्या अधीन राहून तसेच इतर अटीबरोबर सदर प्रकल्प प्रस्तावातील प्रस्तावित रस्त्यांपैकी जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी शिफारस केलेल्या रस्त्यांच्या कामांना टप्पा-१ म्हणून राज्यस्तरीय मान्यता समितीने मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत पंढरपूर नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास (टप्पा-१) प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत सादर करण्यात आलेल्या पंढरपूर नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पास (टप्पा-१) संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहूनखालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. पंढरपूर नगरपरिषदेच्या रस्ते विकास प्रकल्पातील (टप्पा-१) उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण मुख्यअभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे-१ यांनी सादर केलेल्या तांत्रिक मूल्यांकनानुसार (Technical Appraisal) पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | उपांगाचे नांव | अंदाजित रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | Uraban Bank to Bhima river | ६,४२,३७,४४७.०० |
| २ | Sur. no.७१ Vistapan nagar to Shaneshwar math sangola road | ४,४४,३७,५२९.०० |
| ३ | Dhanya Godown to Pune road KBP Collage East Side (IN FRONT OF JUDGE BUNGLOW) | ९,५६,८६,६०२.०० |
| ४ | Kumbhar Galli to Bhima River | ६,८५,८९,५६२.०० |
| ५ | Urban Bank to Anil Nagar to Bhima River | ६,३३,८५,८५८.०० |
| ६ | Bhai rwal Statue Vai Padmavati Garden to Mali Vasti Takli road | १३,९६,९४,२८७.०० |
| ७ | Shahnai Garden to water tank (Prshant Paricharak Nagar) | १,९०,५३,८४९.०० |
| ८ | Veterinary Hospital West side road | ६६,३५,४८८.०० |
| | **प्रकल्पाची किंमत** | **५०,१७,२०,६२२.००** |
| | लेबर वेलफेअर (१%) | ५०,१७,२०६.२२ |
| | इन्शुरन्स (१%) | ५०,१७,२०६.२२ |
| | कंटींजन्सी चार्जेस (३%) | १,५०,५१,६१८.६६ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **५२,६८,०६,६५३.१०** |

**०२. पंढरपूर नगरपरिषदेच्या मंजूर रस्ते विकास प्रकल्प योजनेचा (टप्पा-१) वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील.**

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्ग | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | पंढरपूर नगरपरिषद **"ब"** वर्ग | रु. ५२.६८०६ कोटी | रु. ४४.७७८५ कोटी | रु. ७.९०२१ कोटी |

**०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार पंढरपूर नगरपरिषदेच्यारस्ते विकास प्रकल्पास(टप्पा-१) खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-**

अ) सदर नगरपरिषदेने राज्यस्तरीय मान्यता समितीने प्रकल्पास मंजुरी देताना विहित केलेल्या या शासन निर्णयाच्या प्रस्तावनेतील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

आ) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या सुधारित शासन निर्णयानुसार सुधारीतवित्तीयआकृतीबंधलागूकरताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

**I) बंधनकारक सुधारणा:-**

१. प्रकल्प मंजुरीच्या पहिल्या वर्षात महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

२. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.

५. संबंधित स्थानिक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास,प्रकल्प मंजुरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहील.

६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "नागरी घनकचरा व्यवस्थापन व हाताळणी अधिनियम २०००" च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.

७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८० टक्के करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९० टक्के या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

**II) वैकल्पिक सुधारणा:-**

१. मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुर्नप्रक्रिया व पुर्नवापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.

२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजलसंचय करावे.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जललेखापरिक्षण(वॉटर ऑडीट) करुन घ्यावे.जललेखापरिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

**इ) निधी वितरणाची कार्यपद्धती**

१) मंजूर प्रकल्पांना शासनाचा अनुज्ञेय हिस्सा, अनुदान स्वरूपात २ हप्त्यात वितरीत करण्यात येईल.

२) अनुदानाचा पहिला हप्ता (एकूण अनुज्ञेय अनुदानाच्या ५० टक्के रक्कम) प्रकल्प मंजूरीनंतर वितरीत करण्यात येईल.

३) अनुदानाचा पहिला हप्ता प्राप्त झाल्यानंतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्या प्रमाणात स्वहिश्याच्या पहिल्या हप्त्याची तरतूद करणे आवश्यक राहील.

४) शासनाच्या अनुदानाचा पहिला हप्ता व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा स्वहिस्सा हा एकत्र निधी, शासनाच्या प्रचलित धोरणानुसारविहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.त्यानुसार प्रकल्पाच्या आर्थिक आराखड्यास (फायनान्शियल क्लोजर)संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, नगरपरिषद प्रशासन संचालनालयाची परवानगी प्राप्त केल्यानंतरच, प्रकल्पाची निविदा प्रक्रिया सुरु करणे बंधनकारक राहील.

५) राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेलीपहिल्या हप्त्याची स्वहिश्याची रक्कम अशा एकत्रित रकमेच्या ७० टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

६) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करताना प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव द्यावा.

**ई) प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासकीय/निमशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून "त्रयस्थ तांत्रिक" परिक्षण (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, स्वनिधीतून करुन घेणे बंधनकारक राहिल.तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**उ) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी:-**

"महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयीकृत बँकांकडून"तसेच "हुडको" "(HUDCO), "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण"(एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल)व शासनमान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.तथापि वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. महाभियानातंर्गत कर्ज घेण्याबाबतचा प्रस्ताव वरील बाबींची पूर्तता करून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "राज्य स्तरीय नोडल संस्थेमार्फत" शासनाकडे सादर करावा. शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल. तसेच या संदर्भात कर्ज घेण्याबाबतची कार्यवाही करण्यापूर्वी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या संस्थेचे पत मुल्यांकन (क्रेडीट रेटींग) करुन घेणे आवश्यक राहिल. पत मुल्यांकन (क्रेडीट रेटींग) करुन घेतल्यानंतरच शासनाच्या मान्यतेने कर्ज घेता येईल.

**ऊ) प्रकल्पासंबंधी करारनामा:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांच्या अनुषंगाने राज्यस्तरीय नोडल यंत्रणा व संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांचा द्विपक्षीय सामंजस्य करार करणे बंधनकारक

राहील. सदर द्विपक्षीय सामंजस्य करारनामा तयार करून घेण्याची जबाबदारी नोडल यंत्रणेची राहील.

**ए) "महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत"मंजूर प्रकल्पांची देखभाल व दुरूस्ती:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्प पूर्णत्वास गेल्यानंतर सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

ऐ) राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

ओ) संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासननिर्णयातील तरतुदी तसेच सर्व अटीव शर्तीची पूर्तता करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१६४३०२७३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: CN = Seema Pradeep Dhamdhere, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.03.27 16:55:58 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
४. प्रधान सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक

५. प्रधान सचिव,पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक

६. प्रधान सचिव,नगरविकास विभाग(२) यांचे स्वीय सहायक

७. व्यवस्थापकीय संचालक ,एम.यु.आय.डी.सी.एल ,मुंबई.

८. आयुक्त तथा संचालक ,नगरपरिषद प्रशासन संचालनालय ,मुंबई.

९. मुख्य अभियंता, सार्वजनिक प्रादेशिक बांधकाम विभाग, पुणे.

१०. विभागीय आयुक्त,पुणे विभाग, पुणे.

११. जिल्हाधिकारी, सोलापूर.

१२ . जिल्हा प्रशासन अधिकारी, सोलापूर.

१३. मुख्याधिकारी, पंढरपूर नगरपरिषद,जि.सोलापूर.

१४. निवड नस्ती,नवि-३३.